**अमृत या संस्थेवर नियुक्त केलेले निदेशक, निबंधक, सल्लागार तसेच सन्मानीय सदस्य यांची केलेली नेमणूक रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन आदेश क्र. अमृत-२०२१/प्र.क्र.५१/संस्था**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८/५/२०२२

<u>संदर्भ</u>:- १. इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. अमृत २०२०/प्र.क्र. १०/संस्था (अमृत) दि. २८/६/२०२२

२. इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. प्रसंस्था २०२०/प्र.क्र. ५०/महामंडळे दि. २९/११/२०२१

**<u>प्रस्तावना:-</u>**

महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी Academy of Maharashtra Research, Upliftment and Training (अमृत) या संस्थेची स्थापना नोंदणी रजिस्ट्रेशन ॲक्ट ( Society Registration Act १८६०) आणि सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५०, (सन १९५० चा मुंबई अधिनियमक्र. २९) अंतर्गत करण्यात आलेली आहे. अमृत संस्थेचे कामकाज सुरू करण्याकरीता पदसिध्द अध्यक्षाच्या मान्यतेने, प्राथमिक अवस्थेत तात्पुरती व्यवस्था म्हणून विभागातील अधिकारी/कर्मचा-यांची निदेशक, निबंधक व सल्लागार इ. पदावर नियुक्ती करण्यात आली होती. तसेच अमृत या संस्थेवर Board of Governance मध्ये Honorary Member as eminent citizen म्हणून संस्थेच्या विकासासाठी आवश्यकतेनुसार विशिष्ट कालावधीसाठी सन्माननीय सदस्य यांची नियुक्ती करण्यात आली होती.

या प्रकरणी मा. अध्यक्ष (अमृत) यांच्या समवेतन मा. मंत्रीमहोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.२७/०४/२०२२ रोजी घेण्यात आलेल्या आढावा बैठकीत अमृत संस्थेवर यापुर्वी करण्यात आलेल्या नियुक्त्या रद्द करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत. त्यानुसार अमृत संस्थेवर नियुक्त केलेले निदेशक, निबंधक, सल्लागार इ. तसेच सन्माननिय सदस्य यांची नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश** -

अमृत या संस्थेवर प्राथमिक अवस्थेत तात्पुरती व्यवस्था म्हणून विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांची निदेशक, निबंधक व सल्लागार या पदावर केलेली नियुक्ती त्याचप्रमाणे अमृत संस्थेच्या Board Of Governance मध्ये Honorary Member as eminent citizen म्हणून श्री. मकरंद भिकाजी कुलकर्णी यांची केलेली नियुक्ती प्रशासकीय कारणास्तव या आदेशाव्दारे रद्द करण्यात येत आहे. तसेच सदर पदावरील व्यक्तीना यासाठी शासकीय सुविधा देण्यात येत असल्यास सदर सोयी/सुविधा या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५१९१४३७२२६१३४ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Siddharth A Zalte
Date: 2022.05.19 14:40:06 +05'30'

**(सिध्दार्थ अ. झाल्टे)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.अध्यक्ष, महाराष्ट्र सशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत)
२.निर्देशक, महाराष्ट्र सशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत)
३. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४.अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्विय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
५.निबंधक, महाराष्ट्र सशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत)
६.प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, नागपूर
७. निवडनस्ती